# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : अपंग-१००९/प्र.क्र.२७६/०९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ मार्च, २०१०.

वाचा:- १) शासन परिपत्रक क्रमांक: एसआरव्ही-१०९७/प्र.क्र.३१/९८/१६-अ, दिनांक-१६.०३.१९९९
२) केंद्र शासनाचे ऑफिस मेमोरँडम क्रमांक: ३६०३५/३/२००४/EStt(Res), दिनांक-२९.१२.२००५
३) शासन पत्र, सा.न्या.व वि.स.विभाग, क्रमांक:अपंग-२००२/प्र.क्र.३३१/सुधार-३,दि ०७.०६.२००६
४) शासन परिपत्रक, सा.न्या. व वि.स.विभाग, क्रमांक:अपंग-२००७/प्र.क्र.६१/सुधार-३, दि.२०.०४.२००७
५) शासन शुद्धीपत्रक, सा. न्या. व वि.स.विभाग,क्रमांक:अपंग-२००७/प्र.क्र.६१/सुधार-३, दि २५.०५.२००७
६) शासन परिपत्रक क्रमांक: न्याय-२००७/स.न्या./प्र.क्र.१०३(भाग-३)/१६-अ,दिनांक-१९.१०.२००७

**प्रस्तावना :-**

वरील संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये अपंगांचे आरक्षण "समांतर आरक्षण" म्हणून दर्शविले असून ते सामाजिक आरक्षणांतर्गत असल्याने त्यास सामाजिक आरक्षणावर वाढीव म्हणून गणण्यात येऊ नये, असे स्पष्ट केले आहे. तथापि, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने वरील संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक ०७.०६.२००६ च्या पत्रान्वये अपंगांची नियुक्ती करताना संदर्भ क्रमांक २ येथील केंद्र शासनाच्या ऑफिस मेमोरँडम, दिनांक २९.१२.२००५ मधील मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करावी, असे सर्व नियुक्ती प्राधिकारी यांना कळविले असून त्या पत्रासोबत सदर मार्गदर्शक तत्वांची प्रत देखील जोडून पाठविली आहे.

श्रीमती इंद्रा सहानी विरुद्ध केंद्र शासन प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेले आदेश लक्षात घेऊन तसेच केंद्र शासनाच्या वरील संदर्भ क्र. २ येथील दिनांक २९.१२.२००५ च्या ऑफिस मेमोरँडममधील मार्गदर्शक तत्त्वे विचारात घेता, अपंगांची आरक्षित पदे सरळ सेवेने भरताना ती सामाजिक प्रवर्गात न दर्शविता स्वतंत्रपणे दर्शविण्यात यावीत, असे आदेश संदर्भ क्रमांक ४ व ५ येथील परिपत्रकान्वये दिलेले आहेत. हे दोन्ही आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संगणक सांकेतांक अनुक्रमे क्रमांक २००७०४२०१७११२१००१ व २००७०५२५११३३१२२००१ असे आहेत.

मा. सर्वोच्च न्यायालयाने देखील अपंग हा अपंग आहे. तो खास प्रवर्ग असून त्याचे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, खुला प्रवर्ग, इत्यादी प्रवर्गामध्ये आणखी वर्गवारी होत नाही, असे स्पष्ट केले आहे.

वरील सर्व बाबी लक्षात घेवून सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी आता अपंगांची सरळसेवेने नियुक्ती करताना वरील संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १६.०३.१९९९ च्या शासन परिपत्रकामधील कार्यपद्धतीचा अवलंब न करता वरील सूचनांनुसारच म्हणजे अपंगांची आरक्षित पदे सरळ सेवेने भरताना ती सामाजिक प्रवर्गात न दर्शविता ती स्वतंत्रपणे दर्शविण्यात येऊन अपंगांची पद भरती करण्याची कार्यवाही करावी. मात्र निवड झालेल्या उमेदवारांना ते ज्या सामाजिक प्रवर्गातील असतील त्याच प्रवर्गात समांतर आरक्षण म्हणून सामावून घ्यावे. तसेच या व्यतिरिक्त वर नमूद केल्याप्रमाणे केंद्र शासनाच्या ऑफिस मेमोरँडम, दिनांक २९.१२.२००५ मधील इतर मार्गदर्शक तत्वानुसार अपंगांची पदे भरण्याची कार्यवाही करावी, अशा सूचना संदर्भाधीन क्रमांक ६ येथील शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत. या सूचनांची कार्यवाही होण्यासाठी सदर सूचना पुन्हा सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक :-**

सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी आता अपंगांची सरळसेवेने नियुक्ती करताना वरील संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १६.०३.१९९९ च्या परिपत्रकामधील कार्यपद्धतीचा अवलंब न करता वरील सूचनांनुसारच म्हणजे अपंगांची आरक्षित पदे सरळ सेवेने भरताना ती सामाजिक प्रवर्गात न दर्शविता ती स्वतंत्रपणे दर्शविण्यात येऊन अपंगांची पद भरती करण्याची कार्यवाही करावी. मात्र निवड झालेल्या उमेदवारांना ते ज्या सामाजिक प्रवर्गातील असतील त्याच प्रवर्गात समांतर आरक्षण म्हणून सामावून घ्यावे. तसेच, या व्यतिरिक्त वर नमूद केल्याप्रमाणे शासनाच्या ऑफिस मेमोरँडम दिनांक २९.१२.२००५ मधील इतर मार्गदर्शक तत्वानुसार अपंगांची पदे भरण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे.

अपंग प्रवर्ग वगळता उर्वरित माजी सैनिक, प्रकल्पग्रस्त, भूकंपग्रस्त, महिला, इत्यादी समांतर आरक्षणाबाबत मात्र सदर दिनांक १६.०३.१९९९ च्या शासन परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या कार्यपद्धतीनुसारच कार्यवाही करणे आवश्यक आहे.

कृ.मा.प...

हे आदेश शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे/नगरपालिका/महानगरपालिका/ जिल्हापरिषदा/शासकीय अनुदानप्राप्त संस्था/विद्यापीठे/सहकारी संस्था व शासकीय उपक्रम इत्यादींना लागू करण्यात यावेत.

सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक-२०१००३१९१४५२३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

गो. आ. लोखंडे

(गो. आ. लोखंडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,/ शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* सरकारी वकील, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान सभा) विधानभवन, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान परिषद) विधानभवन, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त/ सर्व जिल्हाधिकारी,/ राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,/ सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
आयुक्त, अपंग कल्याण, ३, चर्च रोड, पुणे-४११ ००१,
निबंधक, अपंग कल्याण आयुक्त यांचे न्यायालय, महाराष्ट्र राज्य, ३, चर्च रोड, पुणे-४११ ००१,
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अपंग कर्मचारी संघटना, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,/ मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
सर्व जिल्हा सेवायोजन अधिकारी, जिल्हा सेवायोजन केंद्र,
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १६-अ
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती/कार्यासन १६-अ
* (पत्राने)